**प्रधानमंत्री आवास योजनेची राज्यात प्रभावी अंमलबजावणी करण्याबाबत. ..........**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रआयो-२०२२/ प्र.क्र.८५/गृनिधो-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २८ एप्रिल, २०२२.

**वाचा:-**

शासन निर्णय:- प्रआयो-२०१५/ प्र.क्र.११० /गृनिधो-२ (सेल), दिनांक ९ डिसेंबर, २०१५.

**प्रस्तावना:-**

सन २०२२ पर्यंत सर्वांसाठी घरे हे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने प्रधानमंत्री आवास योजना ( शहरी ) जून, २०१५ मध्ये सुरू केली आहे. गृहनिर्माण विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री आवास योजना राज्यात राबविण्यात येत आहे. सदर योजनेचा कालावधी मार्च, २०२२ पर्यंत होता. सदर योजनेस केंद्र शासनाने मुदतवाढ दिली असली तरी ही योजना पूर्ण होण्यासाठी उपलब्ध होणारा कालावधी अंत्यत कमी असल्याने, प्रधानमंत्री आवास योजनेस गती देण्याच्या अनुषंगाने व या योजनेअंतर्गत मंजूर झालेले प्रकल्प विहीत वेळेत पूर्ण करण्याच्या दृष्टीने तसेच त्यामध्ये एकसंघता व सुसुत्रता राहण्यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता .

**शासन निर्णय:-**

राज्यात प्रधानमंत्री आवास योजनेचे काम जलदगतीने करण्यासाठी व त्यामध्ये एकसंघता व सुसुत्रता निर्माण करण्याच्या अनुषंगाने तसेच घरांची गुणवत्ता राखण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजनेची (शहरी) राज्यात प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या प्रधानमंत्री आवास योजनेच्या कार्यपध्दतीमध्ये खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

(१) सदर योजनेवर शासनाचे नियंत्रण असणे अत्यंत आवश्यक असल्यामुळे म्हाडा प्राधिकरणाने तपासणी/छाननी केलेले प्रस्तावSLAC/SLSMC व CSMC या समित्यांची मान्यता घेण्यापुर्वी सदर प्रस्तावास शासन मान्यता घेणे अनिवार्य राहील.

(२) प्रधानमंत्री आवास योजनेची (शहरी) अंमलबजावणी म्हाडा मंडळे व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या मार्फत करण्यात येत असल्याने, तसेच सदर प्रस्ताव (डिपीआर) सादर करताना एकसंघता वा सुसुत्रता राहण्यासाठी म्हाडा प्राधिकरणामध्ये सध्या अस्तित्वात असलेल्या पंतप्रधान आवास योजना कक्षाची व्याप्ती वाढविण्यात येऊन सदर कक्ष अधिक सक्षम करण्याकरिता प्रधानमंत्री आवास योजनेच्या तांत्रिक कक्षात १ मुख्य अभियंता, २ कार्यकारी अभियंते, २ उप अभियंते, २ लिपिक-टंकलेखक तसेच लेखा शाखेसाठी १ उप लेखा अधिकारी, १ लिपिक-टंकलेखक यांची नेमणुक करण्यात येत आहे.

(३) प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत म्हाडा मंडळे व खाजगी भागीदारी AHP/ PPP यांच्या मार्फत सादर करण्यात येत असलेले वा सादर केलेले प्रस्ताव (डिपीआर) मान्यतेसाठी सादर करण्यापूर्वी छाननी करणे तसेच मान्यताप्राप्त प्रस्ताव प्रत्यक्ष कार्यान्वित होण्यासाठी प्रधानमंत्री आवास योजनेच्या प्रकल्पांना म्हाडा मंडळ स्तरावर मान्यता देण्यात येते. या प्रकल्पांना मंडळस्तरावर ना हरकत प्रमाणपत्र, देकार पत्रे दिली जातात. मात्र अशी ना हरकत प्रमाणपत्र व देकार पत्र दिल्यानंतर प्रधानमंत्री आवास योजनेच्या प्रकल्पांवर शासनाचे व म्हाडा प्राधिकरणाचे कोणतेही नियंत्रण राहत नाही. बहुतांश वेळा देकार पत्रातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आले आहे. अशा अनियमिततेची प्रधानमंत्री आवास योजनेतील प्रकल्पांच्या लाभार्थींना झळ सोसावी लागते. तसेच, प्रकल्प वर्षानुवर्ष रखडून लाभार्थ्यांना त्यांच्या हक्काच्या घरापासून वंचित राहावे लागते. या बाबींचा सर्वकष विचार करून प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत म्हाडा मंडळ स्तरावर देण्यात येणा-या सर्व परवानग्या या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या म्हाडा प्राधिकरणातील प्रधानमंत्री आवास योजनेच्या तांत्रिक कक्षामार्फ़त देण्यात याव्यात .

(४) सदर योजनेअंतर्गत निर्माण होणाऱ्या घरांची गुणवत्ता राखण्याच्या दृष्टीने म्हाडा प्राधिकरण/खाजगी भागीदारी AHP/PPP व स्थानिक स्वराज्य संस्था वा अन्य अंमलबजावणी यंत्रणा जसे सिडको, एमएमआरडीए, एनएमआरडीए, पीएमआरडीए इ. मार्फत राबविण्यात येणाऱ्या प्रकल्पांचे म्हाडा प्राधिकरणामध्ये स्थापन केलेल्या तांत्रिक कक्षामार्फत तपासणी / छाननी करण्यात यावी.

(५) प्रधानमंत्री आवास योजनेअंतर्गत राज्य हिश्शाचा व केंद्र हिश्शाचा निधी वितरीत करताना शासनाची पुर्व परवानगी घेण्यात यावी व त्यासाठी निधी वितरणाचे प्रस्ताव तांत्रिक कक्षाच्या अहवालासह शासन मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत.

(६) प्रधानमंत्री आवास योजनेअंतर्गत घरकुलांची भौतिक प्रगती लक्षात घेऊन अंमलबजावणी यंत्रणेमार्फ़त निधीची मागणी सुकाणू अभिकरण म्हणून म्हाडा प्राधिकरणाकडे केली जाते. त्यानंतर सर्व तपासणीअंती म्हाडा प्राधिकरणामार्फ़त शासनास निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला जातो . या सर्व बाबी तपासून आवश्यक त्या कागदपत्रांची पुर्तता करूनच शासनास प्रस्ताव सादर होत असल्याने निधी वितरणाबाबत शासन आदेश निर्गमित झाल्यानंतर पुन्हा तपासणीसाठी प्रधानमंत्री आवास योजनेच्या कक्षाकडे न जाता थेट प्राधिकरणाच्या लेखा शाखेमार्फ़त संबंधित अंमलबजावणी यंत्रणा अथवा विकासकाच्या बॅकेतील खात्यामध्ये२४ तासाच्या आत ( सुट्टीचे दिवस वगळता ) मंजूर निधी जमा करण्याची कार्यवाही वित्त नियंत्रक , म्हाडा प्राधिकरण यांनी करावी.

२. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४२९१३०६५३९७०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAJU GULABRAO AMBADEKAR
Date: 2022.04.29 13:09:01 +05'30'

**( राजु अंबाडेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण , गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
३. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, ( पत्राने )
४. प्रधान सचिव (नवि-२) , नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
६. मा. मंत्री ( गृहनिर्माण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. मा. राज्यमंत्री ( गृहनिर्माण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. संबंधित कोषागार अधिकारी.
९. प्रधान सचिव (गृहनिर्माण) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१०. निवडनस्ती (गृनिधो-२)